# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### राज्यातील आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटूंबियांना मदत करण्याबाबत

**(१) १९३३४ (१९-०८-२०१६). श्री.प्रकाश गजभिये, डॉ.सुधीर तांबे, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.अनिल भोसले : तारांकित प्रश्न क्रमांक १५९६६ ला दिनांक १४ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात इतर राज्यांच्या तुलनेत सर्वाधिक शेतकऱ्यांच्या आत्महत्या होत असून मागील १५ वर्षात झालेल्या २० हजार ८७३ शेतकरी आत्महत्यांपैकी १० हजार ३९० शेतकऱ्यांच्या आत्महत्या शासनाच्या मदतीच्या निकषात अपात्र ठरविण्यात आल्याचे माहे मार्च, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उत्तर महाराष्ट्रात चार महिन्यात १४४ तर दिनांक १५ मे, २०१६ पर्यंत १५२ शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शासनाच्या निकषात शिथिलता आणून आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या कुटुंबियांना मदत करण्याबाबत, मदत निधीमध्ये वाढ करण्याबाबत तसेच आत्महत्येचे प्रमाण कमी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-०७-२०१८) :** (१) व (२) अंशतः खरे आहे.
(३) कै. वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन अंतर्गत सर्व गरजू शेतकऱ्यांना अन्न सुरक्षा योजना, आरोग्य सुविधा, राजीव गांधी जीवनदायी योजनेचा लाभ देण्यात येत आहे. आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या कुटुंबियांच्या मुलांना मोफत शिक्षणाची योजना, जलयुक्त शिवार योजनेंतर्गत कामे, म.न.रे.गा. अंतर्गत कामे तसेच शेती विकासासंदर्भात शासनाच्या विविध विभागामार्फत उपाययोजना करण्यात येत आहेत. तसेच उस्मानाबाद व यवतमाळ जिल्हयात पथदर्शी प्रकल्प बळीराजा चेतना अभियान राबविण्यात येत आहे.

आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटुंबियांना देय असलेल्या रुपये १.०० लक्ष इतक्या मदतीच्या रकमेमध्ये अद्यापी वाढ करण्यात आलेली नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हयातील शाळांमध्ये राईट टू एज्यूकेशन अंतर्गत विदयार्थ्यांना प्रवेश देण्याबाबत

**(२) २००९५ (२३-०८-२०१६). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर जिल्हयातील ५९५ शाळांमध्ये राईट टू एज्यूकेशन अंतर्गत ७४१५ जागा आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या राईट टू एज्यूकेशन अंतर्गत जिल्हयातील किती विद्यार्थ्यांनी अर्ज केले आहेत व किती विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आला आहे,

(३) तसेच ज्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आला नाही त्यांना प्रवेश न देण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) नागपूर जिल्ह्यात राईट टू एज्युकेशन अंतर्गत १३६३९ अर्ज पालकांनी सादर केले व ४९५९ बालकांना शाळेमार्फत प्रवेश देण्यात आले.

संगणकीय प्रणालीमार्फत बालकांची प्रवेशाकरीता शाळेत निवड झाली. शाळेत निवड होवूनही पालकांनी शाळेत संपर्क साधला नाही. त्यामुळे प्रवेश होऊ शकले नाहीत. तसेच काही शाळांनी विद्यार्थ्यांना अंतराचे कारण देवून प्रवेश दिलेले नाहीत.

---

**लोणखेडी (ता.जि.धुळे) गावातील आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटूंबियांना मदत करण्याबाबत**

**(३) २२८६६ (१९-०९-२०१६). श्री.हरिसिंग राठोड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लोणखेडी (ता.जि.धुळे) गावातील शेतकऱ्याने नापिकी व कर्जबाजारीपणाला कंटाळून विष पिऊन आत्महत्या केल्याचे माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटूंबियांना मदत करण्याबाबत तसेच, शेतकरी आत्महत्या रोखण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) कै.भटू विक्रम पाटील व कै.गोरख गजमल पाटील हे दोन्ही आत्महत्याग्रस्त शेतकरी लोणखेडी, ता.जि.धुळे येथील रहिवासी असून सदर शेतकऱ्यांनी कर्जबाजारीपणामुळे आत्महत्या केली आहे. आत्महत्याग्रस्त

शेतकऱ्यांच्या कुटुंबियांना शासन निर्णय दिनांक २३/०१/२००६ अन्वये रुपये १ लक्ष सानुग्रह अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी उस्मानाबाद व यवतमाळ या दोन जिल्ह्यांमध्ये पथदर्शी प्रकल्प राबविण्यात येत असून त्याअंतर्गत बळीराजा चेतना अभियान राबविण्यात येत आहे. तसेच शेतकऱ्यांची कर्जमाफी करण्यासाठी “छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना २०१७” राबविण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रत्नागिरी जिल्ह्यातील शाळांची दुरुस्ती करण्याबाबत

**(४) २४९१९ (१६-१२-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रत्नागिरी जिल्ह्यातील शेकडो शाळांची दुरवस्था झाली असून त्या जमीनदोस्त होण्याच्या मार्गावर असल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने निर्णय घेऊन उक्त शाळांचे स्ट्रक्चरल ऑडीट करुन त्यांची दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) उक्त शाळांचे टप्प्याटप्प्याने प्राथमिक स्ट्रक्चरल ऑडिट करण्याची कार्यवाही सुरु आहे. जिल्ह्यातील १९३ प्राथमिक शाळांच्या ३३४ वर्गखोल्या नादुरुस्त आहेत. त्यापैकी १८४ शाळांचे ३२४ वर्गखोल्या निर्लेखनास मंजूर देण्यात आली असून जिल्हा वार्षिक योजनेमधून निधी उपलब्धतेनुसार टप्प्याटप्प्याने दुरुस्ती करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील आश्रमशाळेतील सोयी-सुविधासंदर्भात समन्वय समिती स्थापन करण्याबाबत

**(५) २७०७३ (१५-०४-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय अनुदानित आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सोयी-सुविधांबाबत क्षेत्रिय अधिकाऱ्यांची समन्वय समिती स्थापन करण्याचे आदेश शासनाने माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, समितीची स्थापना केली आहे काय, या समितीच्या कार्यकक्षा काय आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (११-०४-२०१८) :** (१) व (२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, दिनांक २७/१२/२०१६ अन्वये जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समन्वय समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-

- जिल्हास्तरीय समितीने प्रत्येक तिमाहीस जिल्ह्यातील शासकीय आश्रमशाळांमधील सेवा सुविधांबाबत आढावा घेऊन सदर शाळांमध्ये पायाभूत सुविधा, आरोग्य विषयक सुविधा, पोषण स्वच्छ पाणीपुरवठा, सुरक्षेच्या दृष्टिने शाळेतील पोषक वातावरण, शैक्षणिक दर्जा इत्यादी संदर्भात करावयाच्या उपाययोजनांचा कालबध्द आराखडा तयार करावा.
- सदरचा आराखडा तयार करताना प्रकल्प स्तरावरील समितीने केलेल्या शिफारशी व त्या बैठकीतील निर्णय याचा विचार करण्यात यावा.
- वरील आराखड्यास अनुसरुन कामाशी संबंधित क्षेत्रिय यंत्रणांकडून विहित वेळेत होते किंवा नाही याचा आढावा प्रत्येक तिमाहीस घेण्यात यावा.

- समितीने सदर आराखड्याची अंमलबजावणीची संबंधित क्षेत्रिय यंत्रणांकडून विहित वेळेस होते किंवा नाही याचा आढावा प्रत्येक तिमाहीस घेण्यात यावा.
- क्षेत्रिय कार्यालयांकडून आश्रमशाळांना सोयी सुविधा मिळण्यास अडचण होऊन काही समस्या निर्माण झाल्यास सदर बाब समितीने त्यांचे वरीष्ठ अधिकाऱ्यांच्या व संबंधित प्रशासकीय विभागाच्या निदर्शनास आणून द्यावी.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वांद्रे व्हिलेज, मुंबई येथील इमारतीच्या बांधकामात अनियमितता झाल्याबाबत

**(६) २७३५३ (१४-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईच्या वांद्रे व्हिलेज येथील न.भु.क्र.ई-४४, १६ वा रोड, खार (प) येथील भूखंडावरील इमारतीचे बांधकाम करताना अनियमितता झाल्याची बाब माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर बांधकाम महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट ॲथोरिटी, मुंबई विकास नियंत्रण नियमावली व मुंबई महानगर कायदा यांचे उल्लंघन करून केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याप्रकरणी लोकप्रतिनिधींनी चौकशीची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी झालेल्या अनियमिततेबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत, तदनुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१३-०६-२०१८) :** (१) सदरची योजना बृहन्मुंबई विकास नियंत्रण नियमावलीतील विनियम ३३(१०) अंतर्गत 'झोपडपट्टी पुनर्वसन योजना' नसून विनियम ३३(१४) अंतर्गत मोकळ्या भूखंडावर कायम स्वरुपी संक्रमण गाळे (PTC) बांधून देण्याबाबतची योजना आहे. खार, मुंबई येथील १७ PTC सदनिकांसह एकूण २२४ PTC+६ सुविधा सदनिकांबाबत, ५ योजनांच्या एकत्रिकरणाशी संबंधित सदर बाब आहे.

(२) हे खरे नाही.

(३) विविध लोकप्रतिनिधींनी याविषयी विधानमंडळामध्ये तारांकित प्रश्न, लक्षवेधी सूचना उपस्थित केली होती.

(४) विकासकाने कायमस्वरुपी संक्रमण गाळे विहित कालावधीत बांधून देण्याच्या अटीची पूर्तता न केल्याने विकासक व वास्तुविशारद यांच्यावर दिनांक १८/०७/२०१७ रोजी क्र.८१/१७ अन्वये MRTP अंतर्गत झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने गुन्हा दाखल केला आहे. तसेच शासनाने दिनांक ०५/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्देशानुसार विकासक मे.मोरदानी यांच्यावर खार पोलीस स्टेशन येथे दिनांक २०/११/२०१७ रोजी क्र.४५५/१७ आय.पी.सी. कलम ४२०,३४ अंतर्गत झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाकडून फसवणूकीचा गुन्हा दाखल करण्यात आला आहे, पोलीस खात्यामार्फत चौकशी चालू आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## भिवंडी (जि.ठाणे) तालुक्यातील आत्महत्याग्रस्त शेतकऱ्याच्या कुटूंबियांना मदत करण्याबाबत

**(७) २८३३५ (१३-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिवंडी (जि.ठाणे) तालुक्यातील शेतकरी गौरु भागा शेलार यांनी विषारी कीटकनाशक पिऊन आत्महत्या केल्याचे दिनांक ३० डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटूंबियांना मदत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

ठाणे जिल्ह्यातील भिवंडी तालुक्यामध्ये माहे डिसेंबर, २०१६ मध्ये कै.गौरू भागा शेलार, रा.मालबिडी या शेतकऱ्याने आत्महत्या केली आहे.

(२) आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या कुटुंबियांना मदत देण्याकरीता जिल्हास्तरीय समितीने प्रस्ताव मंजूर करून तहसिलदार, भिवंडी यांच्यामार्फत आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना शासन निर्णय दिनांक २६/०१/२००६ नुसार रुपये १ लाख दिनांक ०८/०८/२०१७ रोजी मदत देण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जिल्हाधिकरी कार्यालय, पुणे यांना भाडे तत्वावर दिलेल्या जागेचे भाडे प्रलंबित असल्याबाबत

**(८) २९७६६ (१५-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हा परिषदेच्या जुन्या इमारतीमधील काही जागा जिल्हाधिकारी कार्यालयास भाडे तत्तवावर दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हाधिकारी कार्यालयाने हे भाडे दिले नसल्याने रुपये पावणे तीन कोटी प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून जिल्हा परिषदेला त्यांचे प्रलंबित भाडे देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०५-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) व (४) वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार प्रस्तुत प्रकरणी भाड्याच्या रक्कमेस मंजुरी देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास आहेत. जिल्हाधिकारी, पुणे यांचेकडून पुणे जिल्हा परिषदेच्या जुन्या इमारतीमधील भाडे तत्वावर वापरात असणाऱ्या जागेचे भाडे मंजूर करण्याचा प्रस्ताव अद्‌याप प्रशासकीय विभागास प्राप्त झालेला नाही. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर भाड्याच्या रकमेस मंजुरी देण्याबाबत नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल.

---

**माध्यमिक शाळेतील शिक्षण सेवकास सेवेत पुर्नदाखल करुन घेण्याबाबत**

**(९) ३४०६८ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माध्यमिक शाळेतील शिक्षकास अतिरिक्त ठरविताना शाळेची विषयनिहाय निकड लक्षात घेणे आवश्यक असताना विषयांची निकड लक्षात न घेता केवळ सेवा जेष्ठतेच्या आधारे शिक्षण सेवकांना सेवामुक्त करण्यात आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विषयाची निकड समजून शिक्षण सेवकास सेवा सातत्य देण्याबाबत तसेच शाळेची विषयनिहाय निकड लक्षात घेता सेवामुक्त केलेल्या व शाळेला निकड असलेल्या शिक्षण सेवकास सेवेत पुर्नदाखल करून घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०५-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे,

विषय निहाय निकड, आरक्षण इ. बाबी विचारात घेऊन शिक्षकांना अतिरिक्त ठरविण्यात आले आहे. तथापि पद कमी झाल्यामुळे कार्यरत शिक्षण सेवकांची सेवा संपुष्टात आणणे अनिवार्य असल्यामुळे त्यांना सेवामुक्त केले आहे.

(२) शासन निर्णय दिनांक २७/०६/२०१६ नुसार आयुक्त,शिक्षण यांचेस्तरावर जेष्ठता यादी नुसार समायोजनाची कार्यवाही सुरू आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**प्राथमिक व माध्यमिक शाळेतील संचमान्यता पट संख्येनुसार करण्याबाबत**

**(१०) ३४०७५ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) प्राथमिक व माध्यमिक शाळेतील संचमान्यता दरवर्षी ३० सप्टेंबर च्या पटसंख्येनुसार करावी असे शासन आदेश आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दिनांक ३० सप्टेंबर, २०१५ च्या विद्यार्थी संख्येच्या आधारे सन २०१६-२०१७ करीता शिक्षकांची पदे मंजूर करता येतील काय,
(३) असल्यास, मागील वर्षाच्या व चालू वर्षाच्या पटसंख्येतील फरकामुळे शिक्षकांच्या पद संख्येत तफावत होत असून त्याचे शालेय व्यवस्थेवर विपरीत परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दिनांक ३० सप्टेंबर, २०१६ प्रमाणे शिक्षक संख्या निश्चित होईपर्यंत अतिरिक्तांच्या समायोजनाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०५-२०१८) :** (१) होय हे खरे आहे.
(२) दिनांक ३० सप्टेंबर, २०१५ नुसार २०१५-१६ साठी पदे मंजूर होतात.
(३) अंशत: खरे आहे.

तथापि सन २०१५-१६ मध्ये अतिरिक्त शिक्षक असल्यास व सन २०१६-१७ मध्ये विद्यार्थी संख्या वाढल्यास अतिरिक्त शिक्षकांच्या मर्यादेत पदे मंजूर केली आहेत त्यामुळे शासकीय व्यवस्थेवर विपरीत परिणाम झालेला नाही.
(४) सन २०१५-१६ च्या संच मान्यतेनुसार अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांचे समायोजन ऑनलाईन पध्दतीने करण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नॅक कमिटी/समितीमार्फत मुल्यांकन न झालेल्या महाविद्यालयांची मान्यता काढण्याबाबत

**(११) ३५२०१ (०२-०१-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाशी संलग्नित असणाऱ्या राष्ट्रीय मुल्यांकन व अधिस्विकृती परिषद (नॅक) मुल्यांकन न केलेल्या महाविद्यालयांची संख्या २८६ असल्याचे दिनांक ११ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उच्च शिक्षण विभागाच्या निर्णयानुसार शासकीय, अनुदानित आणि विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य आदि विद्याशाखेच्या कॉलेजांची स्थापना झाल्यावर त्यांना दोन वर्षात नॅकचे मुल्यांकन करणे अनिवार्य आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यातील विनाअनुदानित तत्वावरील कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांनी नॅक कमिटी/समितीमार्फत मुल्यांकन करून घेतलेले नाही, अशा बहुतांश ठिकाणी विनाअनुदानित महाविद्यालयांकडून उच्च शिक्षणासाठीच्या आवश्यक भौतिक व शैक्षणिक निकषांची पूर्तता केली जात नसल्याचेही निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, महाविद्यालयांकडून विद्यार्थ्यांना चुकीचे, निकृष्ट दर्जाचे शिक्षण दिले जात असून विद्यार्थ्यांचे होत असलेले शैक्षणिक नुकसान विचारात घेता, अनुदानित महाविद्यालयाच्या धर्तीवर विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांना नॅक कमिटीमार्फत मुल्यांकनाची सक्ती करणे वा अशा विनाअनुदानित महाविद्यालयांची मान्यता काढून घेणेबाबत शासनाचे धोरण काय आहे,
(५) नसल्यास, विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांची शैक्षणिक गुणवत्ता व भौतिक तसेच शैक्षणिक सोयी सुविधांची नॅकद्वारे तपासणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (१५-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे. सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाशी संलग्नित असणाऱ्या एकूण २२४ महाविद्यालये/मान्यताप्राप्त परिसंस्थांनी राष्ट्रीय मुल्यांकन व अधिस्विकृती परिषदेकडून (नॅक) मुल्यांकन करुन घेतलेले आहे.

(२) हे खरे नाही. पदवीधर विद्यार्थ्यांच्या कमीत कमी दोन तुकड्या उत्तीर्ण झालेल्या किंवा अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांना ६ वर्षे तसेच राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद यांच्या अखत्यारित येणाऱ्या ज्या महाविद्यालयांना ३ वर्षे झालेली आहेत अशी महाविद्यालये राष्ट्रीय मुल्यांकन व अधिस्विकृती परिषदेकडे अधिस्विकृतीसाठी अर्ज करण्यास पात्र ठरतील.

(३) हे खरे नाही. महाविद्यालये/मान्यताप्राप्त परिसंस्था यांना प्रत्येक शैक्षणिक वर्षामध्ये संलग्निकरणाचे नुतनीकरण करण्यासाठी परिनियम ५९७ अन्वये स्थानिक चौकशी समिती नियुक्त करुन सदर समितीकडून उच्च शिक्षणासाठीच्या आवश्यक भौतिक व शैक्षणिक निकषांची पूर्तता केली जाते किंवा नाही याबाबतचा अहवाल स्पष्ट शिफारशीसह विद्यापीठास सादर केला जातो.

(४) याबाबत शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, दिनांक ०८/१०/२०१० अन्वये सर्व अकृषी विद्यापीठे व संलग्नित सर्व पात्र अनुदानित महाविद्यालयांनी/संस्थेनी संबंधित प्राधिकरणाकडून मुल्यांकन व पुर्नमुल्यांकन करुन घेणे अनिवार्य असल्याचे निर्देश देण्यात आलेले आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाकडून**
**पीएचडीसाठी उमेदवारांच्या नोंदणीबाबत**

**(१२) ३५९२७ (०२-०१-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाकडून पीएचडीसाठी दर्जेदार उमेदवारांचीच नोंदणी व्हावी यादृष्टीने उमेदवारांसमोरील आव्हानात आणखी वाढ करण्याचा शासनाचा विचार सुरु आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पेट बाबत कुठलीही अधिकृत घोषणा झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नोंदणी इच्छुक उमेदवारांमधील संभ्रम दूर करण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाकडून पीएचडी पदवी नोंद परीक्षा (पेट) अधिक स्पर्धात्मक करण्यात आली असून यासाठी विद्यापीठाव्दारे दिनांक ११/१२/२०१७ रोजी निदेश क्रमांक ३७/२०१७ निर्गमित करण्यात आला आहे.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**येवला (जि.नाशिक) येथे मुस्लिम कल्चरल सेंटरची निर्मिती करण्याबाबत**

**(१३) ३६१११ (०२-०१-२०१८). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) येवला (जि.नाशिक) येथील अल्पसंख्यांक समुदायातील मुस्लिम समाजाच्या विकासासाठी व त्यांना रोजगार स्वयंरोजगाराच्या मार्गदर्शनासाठी मुस्लिम कल्चरल सेंटरची निर्मिती करण्याची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे दिनांक ३१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर मागणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) होय.
(२) अल्पसंख्यांक समाजाचा विकास करण्यासाठी या विभागामार्फत, राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत दुसरी/तिसरी पाळी सुरु करणे, अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजना, अल्पसंख्यांक मुलां/मुलींसाठी वसतीगृहे, राज्यातील अल्पसंख्यांक लोकसमूहातील उमेदवारांना शासकीय/ निमशासकीय सेवेत संधी उपलब्ध करण्याकरीता केंद्रीय लोकसेवा आयोग/महाराष्ट्र लोकसेवा आयोग/बँकीग सेवा इत्यादी स्पर्धा परीक्षांसाठी तसेच व्यवसायिक अभ्यासक्रमामधील प्रवेशाकरीता घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी आणि इयत्ता १० वी व १२ वी अनुत्तीर्ण अल्पसंख्यांक उमेदवारांकरीता "मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबंध्द योजना", रोजगाराभिमूख प्रशिक्षण फी प्रतिपूर्ती योजना, पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण, स्वयंरोजगारासाठी मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाकडून कर्ज उपलब्ध करुन देण्याची योजना, अशा विविध योजना राबविण्यात येत आहेत. तथापि, या उद्दीष्टाकरीता "मुस्लीम कल्चरल सेंटर" च्या निर्मिती करण्याविषयीची कोणतीही योजना सद्य:स्थितीत अस्तित्वात नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कांदा लिलावात सहभागी न होणाऱ्या व्यापाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत**

**(१४) ३६५३९ (०२-०१-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कांदा लिलावात सहभागी न होणाऱ्या व्यापाऱ्यांचे परवाने रद्द करण्याचे निर्देश सहकार विभागाने बाजार समित्यांना माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिलेले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आतापर्यंत कांदा लिलावात सहभागी न होणाऱ्या किती व्यापाऱ्यांचे परवाने रद्द करण्यात आले आहेत किंवा करण्याचे निश्चित केलेले आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२४-०५-२०१८) :** (१) होय.

जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नाशिक यांनी पणन अधिनियमातील कलम ४०-ई अन्वये, दिनांक १५/९/२०१७ रोजी नाशिक जिल्हयातील सर्व कृषी उत्पन्न बाजार समित्यांना निर्देश दिले होते.

(२) दिनांक १३ सप्टेंबर, ते १७ सप्टेंबर,२०१७ या कालावधीत जिल्हयातील सततच्या मुसळधार पावसामुळे काही व्यापाऱ्यांचा माल भिजल्यामुळे व काही व्यापाऱ्यांच्या प्लॉटमध्ये पावसाचे पाणी साचल्याच्या कारणास्तव व्यापारी दैनिक कांदा लिलावात सामील झाले नव्हते. मात्र,त्यानंतर दिनांक १९ सप्टेंबर,२०१७ पासून कांदा लिलावाचे कामकाज सुरळीत चालू राहील्याने व्यापाऱ्यांविरुध्द कारवाई करण्यात आली नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील मुलांना व्यवसाय मार्गदर्शन व मानसशास्त्रीय समुपदेशन करण्याकरीता शिक्षकांची निवड केल्याबाबत

**(१५) ३६९०६ (०४-०१-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या दिनांक २५ ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्यातील १०० टक्के मुलांना व्यवसाय मार्गदर्शन व मानसशास्त्रीय समुपदेशन करण्याकरीता सुमारे ६६ शिक्षकांची निवड करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ६६ शिक्षकांवर सोपविलेल्या जबाबदारीमुळे या उपक्रमाचे उद्धिष्ट साध्य होत आहे काय,

(३) असल्यास, याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-०५-२०१८) :** (१) नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) निवड प्रक्रियेची कार्यवाही चालू आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई (जि.पालघर) तालुक्यात बाटलीबंद अशुध्द पाणी विकणाऱ्या कंपन्यांवर कारवाई करण्याबाबत

**(१६) ३६९८७ (०२-०१-२०१८). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई (जि.पालघर) तालुक्यात बाटलीबंद अशुध्द पाणी विकणाऱ्या बोगस कंपन्यांमध्ये दिवसेंदिवस वाढ होत असून दोनशेहून अधिक बोगस कंपन्या कार्यरत असल्याचे माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार आतापर्यंत किती बोगस कंपन्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (२२-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) अन्न व औषध प्रशासनामार्फत वसई तालुक्यात सन २०१४ पासुन सदर प्रकरणी खातर जमा करण्यासाठी विशेष मोहिमा राबवून आतापर्यंत सुमारे ९५ पाण्याशी संबंधित व्यवसाय करणाऱ्या पेढ्यांना भेट देवून तपासणी करण्यात आली. त्यापैकी अन्न सुरक्षा व मानदे कायद्यात नमूद तरतूदींचे उल्लंघन करणाऱ्या १५ पेढ्यांवर न्यायालयात खटले दाखल करण्यात आले असून ५ आस्थापनांना उत्पादन बंद करण्याचे आदेश देण्यात आले आहेत. एका प्रकरणी खटला दाखल करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**दहिसर प्रादेशिक परिवहन कार्यालय आनंदनगर, दहिसर (पूर्व) येथे स्वच्छ भारत अभियानांतर्गत शौचालय बांधण्याबाबत**

**(१७) ३७२२७ (०३-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दहिसर प्रादेशिक परिवहन कार्यालय आनंदनगर, दहिसर (पूर्व) मुं-६८ येथे स्वच्छ भारत अभियानांतर्गत पुरूष व महिलांसाठी शौचालय बांधण्याठी नाहरकत प्रमाणपत्र मिळणेकरीता लोकप्रतिनिधींनी दिनांक ०८/०९/२०१७ रोजी मा.परिवहन राज्यमंत्री यांच्याकडे पत्रव्यवहार करूनही कोणतीच कार्यवाही झालेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने ना हरकत प्रमाणपत्र मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१२-०६-२०१८) :** (१) व (२) उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, बोरिवली हे बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या कांदरपाडा, लिंक रोड, दहिसर (पूर्व) या जागेत भाडे तत्वावर कार्यरत आहे. या कार्यालयात पुरुष व महिलांसाठी तसेच अपंगांसाठी स्वतंत्र शौचालये आहेत. तसेच सदर ठिकाणी पर्याप्त शौचालयाची व्यवस्था असल्याचे बृहन्मुंबई नगरपालिकेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना अतिरिक्त जिल्हाधिकारी (अपिल) पदावर पदोन्नती देण्याबाबत**

**(१८) ३७६८५ (०५-०४-२०१८). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : दिनांक ४ ऑगस्ट, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात**

**आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ६ मधील प्रश्न क्रमांक १८९०५ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हाधिकारी कार्यालयांमध्ये मोठ्या प्रमाणात अपिल प्रकरणे प्रलंबित असल्यामुळे अतिरिक्त जिल्हाधिकारी (अपिल) हे पद निर्माण करण्यात येवून पात्र उमेदवारांना सदर पदावर पदोन्नती देण्याचा निर्णय घेण्याचे बंधन घालण्यात येईल असे मा.महसूल मंत्री यांनी दिनांक २५ मार्च, २०१५ रोजी वा त्यासुमारास आश्वासन दिलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पदोन्नती समितीची बैठक घेऊन कार्यवाही करण्याची राज्याच्या मुख्य सचिवांना माहे ऑक्टोबर २०१५ मध्ये पत्राद्वारे विनंती केलेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना गेल्या १९ वर्षांपासून एकही पदोन्नती न मिळाल्याने त्यांना अप्पर जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नत करण्याकरीता एक महिन्याच्या आत कार्यवाही करण्यासाठी मा.महसूल मंत्री यांनी प्रधान सचिवांना दिनांक २८ जानेवारी, २०१५ रोजीच्या बैठकीत सूचना दिलेल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-०५-२०१८) :** (१), (२), (३) व (४) अतिरिक्त जिल्हाधिकारी या संवर्गातील अधिकाऱ्यांकडे विषय वाटपानुसार अपीलाचे काम सोपविण्यात आले आहे.

विधानमंडळाच्या सन २०१५ च्या पहिल्या अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये अतिरिक्त जिल्हाधिकारी यांची रिक्त पदे भरण्याबाबत तत्कालीन मा.मंत्री (महसूल) यांनी आश्वासन दिले होते. त्यास अनुसरुन उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नती देण्याबाबतचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आला व सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने दिनांक १७/२/२०१६ रोजी आस्थापना मंडळाची बैठक पार पडली. त्यानुषंगाने शासन आदेश, महसूल व वन विभाग

दिनांक २७/६/२०१६ अन्वये ४० उपजिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील अधिकाऱ्यांना अतिरिक्त जिल्हाधिकारी या पदावर पदोन्नती देण्यात आली असून रिक्त पदे भरण्यात आली आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील जिल्हा विभाजन व तालुके निर्मितीबाबत**

**(१९) ३७९७० (०५-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया, डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम : तारांकित प्रश्न क्रमांक ३३६६४ ला दिनांक २४ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा विभाजनाबाबत निकष निश्चित करण्याकरीता अप्पर मुख्य सचिव (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली गठीत समितीचा शासनास प्राप्त झालेल्या अहवालावर तपासणीअंती धोरणात्मक निर्णय घेण्याची सुरु असलेली कार्यवाही पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निश्चित केल्या जाणाऱ्या धोरणानुसार/निकषानुसार नाशिक व अन्य जिल्ह्यांचे विभाजन पुनर्रचनेसंदर्भात निर्णय घेण्याचे प्रस्तावित असून मंत्रिमंडळाने प्रश्नोक्त बाबीसंबंधीच्या धोरण/निकषांना मान्यता प्रदान केली आहे काय व त्यानुषंगाने नाशिक जिल्ह्याचे विभाजन करून स्वतंत्र मालेगांव जिल्हा निर्मितीबाबत शासनस्तरावरून कोणता निर्णय घेण्यात आला वा घेण्यात येत आहे,

(३) असल्यास, तालुका विभाजनाच्या अनुषंगाने निकष निश्चित करण्याबाबत विभागीय आयुक्त (कोकण) यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या शासनास प्राप्त झालेल्या अहवालातील शिफारशींचे अनुषंगाने सर्व विभागीय आयुक्तांकडून मागविण्यात आलेले अभिप्राय शासनास प्राप्त झालेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, तालुका विभाजनाचे निकष निश्चित करण्याकामी धोरण अंतिम करण्याची शासनस्तरावरून सुरु असलेली कार्यवाही पूर्ण झाली आहे काय, याप्रकरणी धोरण अंतिम करण्यात आले आहेत काय, तालुक्यांचे विभाजन करून नविन तालुका निर्मितीसंदर्भात निर्णय घेऊन मालेगांव (जि.नाशिक) तहसिल कार्यालयाची तसेच, बोरगांव मंजू येथे स्वतंत्र तहसिल कार्यालयाची निर्मिती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून जिल्हा विभाजन व तालुके निर्मितीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०६-२०१८) :** (१) नाही.
(२) जिल्हा विभाजनाबाबत निकष निश्चित करण्याकरीता गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल प्राप्त झाला असून सदर समितीच्या अहवालाच्या अनुषंगाने धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेस्तव सादर करण्याच्यादृष्टीने कार्यवाही सुरु आहे. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निश्चित केल्या जाणाऱ्या निकषानुसार जिल्ह्याचे विभाजन/ पुनर्रचनेबाबत प्रकरणपरत्वे उचित निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.
(३) होय.
(४) तालुका विभाजनाच्या अनुषंगाने निकष निश्चित करण्याबाबत विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल शासनास प्राप्त झालेला आहे. प्राप्त अहवालातील शिफारशीच्या अनुषंगाने सर्व विभागीय आयुक्तांकडून मागविण्यात आलेले अभिप्राय प्राप्त झाले असून त्यांचा विचार करून तालुका विभाजनाचे निकष निश्चित करण्याकामी मंत्रिमंडळाच्या मान्यतेने धोरण अंतिम करण्याच्यादृष्टीने कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे.
(५) जिल्हा विभाजन व नवीन तालुके निर्मितीबाबचे धोरण निश्चित झाल्यानंतर प्रकरणपरत्वे नवीन जिल्हा व तालुका निर्मितीसंदर्भात उचित निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

___

## राज्यात वरिष्ठ महाविद्यालयात तासिका तत्वावरील प्राध्यापकांना मानधन देण्याबाबत

**(२०) ३८१६८ (०५-०४-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, डॉ.सुधीर तांबे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.बाळाराम पाटील : दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ४ मधील प्रश्न क्रमांक ३०१९७ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वरिष्ठ महाविद्यालयात तासिका तत्वावर माहे डिसेंबर, २०१७ पर्यंत कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय संख्या किती आहे,

(२) असल्यास, त्यांना मासिक मानधन दरमहा मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्राध्यापकांचे मानधन दरमहा मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०६-२०१८) :** (१) राज्यात वरिष्ठ महाविद्यालयात तासिका तत्वावर माहे डिसेंबर, २०१७ पर्यंत कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय संख्या पुढीलप्रमाणे आहे :-

| जिल्हा | तासिका तत्वावर कार्यरत प्राध्यापकांची संख्या | | |
|---|---|---|---|
| | अशासकीय | शासकीय | एकूण |
| मुंबई | ०५ | २३१ | २३६ |
| ठाणे | ०६ | ०० | ०६ |
| पालघर | ०३ | ०० | ०३ |
| रायगड | ०५ | ०० | ०५ |
| सिंधुदूर्ग | ०० | ०० | ०० |
| रत्नागिरी | ३३ | ०० | ३३ |
| जळगाव | २५ | ०० | २५ |
| धुळे | ९५ | ०० | ९५ |

| | | | |
|---|---|---|---|
| नंदुरबार | ०२ | ०० | ०२ |
| सोलापूर | ५६३ | ०० | ५६३ |
| अमरावती | ३९९ | ०० | ३९९ |
| अकोला | ३२६ | ०० | ३२६ |
| बुलडाणा | २७२ | ०० | २७२ |
| यवतमाळ | २९७ | ०० | २९७ |
| वाशिम | २२१ | ०० | २२१ |
| नागपूर | ८३० | ०० | ८३० |
| वर्धा | १५३ | ०० | १५३ |
| भंडारा | २४९ | ०० | २४९ |
| गोंदिया | १३८ | ०० | १३८ |
| चंद्रपुर | ३५७ | ०० | ३५७ |
| गडचिरोली | ७० | ०० | ७० |
| कोल्हापूर | ९२६ | ७५ | १००१ |
| सांगली | ६६७ | ०० | ६६७ |
| सातारा | ७१८ | ०० | ७१८ |
| औरंगाबाद | ४४४ | ०० | ४४४ |
| जालना | ११२ | ०० | ११२ |
| बीड | ३१२ | ०० | ३१२ |
| उस्मानाबाद | १८१ | ०० | १८१ |
| पुणे | १०० | ०० | १०० |
| नाशिक | २२ | ०० | २२ |
| अहमदनगर | २५ | ०० | २५ |
| नांदेड | ४५१ | ०० | ४५१ |
| लातूर | ३४६ | ०० | ३४६ |
| परभणी | २०० | ०० | २०० |
| हिंगोली | ४५ | ०० | ४५ |

(२) व (३) होय, तथापि, तासिका तत्वावरील प्राध्यापकांना दरमहा मानधन अदा करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील (एसआरए) गृहनिर्माण संस्था माहिती अधिकाराच्या कार्यकक्षेत आणण्याबाबत

**(२१) ३८२३२ (०६-०४-२०१८). ॲड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील (एसआरए) गृहनिर्माण संस्था माहिती अधिकाराच्या कार्यकक्षेत आणण्याचे व संस्थानिहाय जनमाहिती अधिकारी नेमणूक करुन त्याबाबतची माहिती संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याचे निर्देश राज्य माहिती आयोगाच्या बृहन्मुंबई खंडपीठाच्या आयुक्तांनी दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, तद्नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१३-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाच्या दिनांक २५/०४/२०१८ रोजीच्या पत्रान्वये झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थाचे सचिव यांना जन माहिती अधिकारी म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. तसेच झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाच्या सहकार कक्षातील कार्यरत सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यांना प्रथम अपिलीय अधिकारी म्हणुन घोषित करण्यात आले आहे, असा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा अहवाल आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावळी (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील बसस्थानक सुरु करण्याबाबत

**(२२) ३८२७४ (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावळी (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील बसस्थानक शुल्ल्क कारणास्तव बंद असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्ह्यात बसस्थानक बांधून पूर्ण झाले असूनही अद्याप ते सुरु झालेली नाहीत अशी किती बसस्थानके आहेत तसेच ती सुरु न होण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१३-०६-२०१८) :** (१) होय.

राज्य परिवहन महामंळाच्या बसचे प्रवासी सावळी बसस्थानकावर न थांबता गावाच्या चौरस्त्यावरुनच चढ-उतार करत असल्यामुळे बसस्थानक परिसर वापरात नव्हता. परंतू, लोकप्रतिनीधी यांच्या मागणीनुसार माहे जानेवारी, २०१८ पासून सदर बसस्थानकाचा वापर सुरु करण्यात आलेला असून, त्यामध्ये कोणताही खंड पडलेला नाही.

(२) यवतमाळ जिल्ह्यातील महामंडळाची बांधून पूर्ण झालेली सर्व बसस्थानके कार्यान्वित आहेत.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळांना मोफत वीज उपलब्ध करुन देण्याबाबत

**(२३) ३८२८० (०५-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३१०१५ ला दिनांक २५ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात खाजगी व्यवस्थापनाच्या अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना शासनामार्फत सर्व लाभ दिले जात असून सदर शाळांना व्यापारी दराप्रमाणे वीज दिली जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील खाजगी अनुदानित ८००० माध्यमिक शाळांमध्ये केंद्र शासन पुरस्कृत आयसीटी योजनेंतर्गत प्रत्येकी रुपये १८ लक्ष याप्रमाणे रुपये १४४० कोटी किंमतीच्या संगणक प्रयोगशाळा दिल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर बहुतांश संगणक प्रयोगशाळा अवाजवी वीज बिलामुळे बंद ठेवण्यात आल्याने कोट्यवधी रुपये खर्चून सुद्धा विद्यार्थी संगणकीय शिक्षणापासून वंचित राहत आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन खाजगी व्यवस्थापनाच्या शाळांना मोफत अथवा स्वस्त दरात वीज उपलब्ध करून देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) अंशत: खरे आहे.

केंद्र शासन पुरस्कृत आयसीटी ॲट स्कूल या योजनेंतर्गत ७६१८ संगणक प्रयोगशाळा उभारण्यात आल्या आहेत.
(३) हे खरे नाही.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आर्णी (जि.यवतमाळ) येथील उपविभागीय कार्यालयाची निर्मिती करण्याबाबत

**(२४) ३८२८९ (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३७०२१ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्णी व घाटंजी या दोन तालुक्याकरीता एक उपविभाग निर्माण करण्याचा व त्याचे मुख्यालय आर्णी येथे ठेवण्याचा निर्णय शासनाने दिनांक २६/७/२०१३ च्या अधिसूचनेन्वये घेतला होता.तथापि, या निर्णयाविरुद्ध मा.उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर येथे २ रिट याचिका दाखल झाल्या होत्या. त्यावर मा.उच्च न्यायालयाने उक्त अधिसूचना सदर निर्णयापुरती रद्द बातल केली व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी अर्जदाराची सुनावणी घेऊन शासनास प्रस्ताव सादर करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार विभागीय आयुक्त, अमरावती यांनी अर्जदाराची सुनावणी घेऊन शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार नव्याने निर्णय घेवून अधिसूचना निर्गमित करण्याची सुरू असलेली कार्यवाही पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार विभागीय आयुक्तांनी शासनाला केव्हा प्रस्ताव सादर केला आहे, उक्त प्रस्तावाच्या संदर्भात शासनाने निर्णय घेऊन त्याबाबतची अधिसूचना जारी केली आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून आर्णी व घाटंजी या दोन तालुक्याकरीता एक उपविभाग निर्माण करण्याचा व त्याचे मुख्यालय आर्णी येथे ठेवण्याची अधिसूचना/निर्णय जारी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०६-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) आर्णी व घाटंजी या दोन तालुक्यांकरीता एक उपविभाग निर्माण करण्याबाबत व त्याचे मुख्यालय आर्णी येथे ठेवण्याबाबत प्रारुप अधिसूचना दिनांक ०७/०५/२०१८ रोजी प्रसिद्ध करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जवाहरलाल नेहरु ग्रंथालय, मुंबई विद्यापीठ येथील ग्रंथालयाची वेळ वाढवून देण्याबाबत

**(२५) ३८६०५ (०५-०४-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राजाबाई टॉवरमधील जवाहरलाल नेहरु ग्रंथालय, मुंबई विदयापीठ हे संध्याकाळी सहा वाजताच बंद करण्यात येत असल्यामुळे संध्याकाळच्या वेळेत वर्ग भरणाऱ्या विधीच्या पदव्युत्तर शाखेच्या विदयार्थ्यांची अभ्यासाची गैरसोय होत असल्याने त्यांच्यात नाराजीचे वातावरण निर्माण झाल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विदयार्थ्यांनी विद्यापीठाकडे ग्रंथालयाची वेळ वाढवून देण्याबाबत वारंवार मागणी करण्यात येवूनही विदयापीठ प्रशासनाकडून त्यांच्या मागण्यांकडे दुर्लक्ष करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विदयापीठ ग्रंथालयाची वेळ वाढवून देण्याबाबत कार्यवाही करुन विदयार्थ्यांच्या मागण्याकडे दुर्लक्ष करणाऱ्या दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही. मुंबई विद्यापीठाच्या राजाबाई टॉवरमधील जवाहरलाल नेहरु ग्रंथालयाची वेळ सकाळी १०.०० ते संध्याकाळी ०७.०० वाजेपर्यंत आहे.

(२) हे खरे नाही. परीक्षेच्या काळात विद्यार्थ्यांच्या मागणीनुसार राजाबाई टॉवरमधील जवाहरलाल नेहरु ग्रंथालयाची वेळ संध्याकाळी ०९.०० वाजेपर्यंत वाढविण्यात येते.

(३) विद्यार्थ्यांची सोय करण्यात आली आहे. त्यामुळे कारवाई करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

## राज्यातील सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांच्या समस्यांबाबत

**(२६) ३८७२२ (०५-०४-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित : दिनांक १४ डिसेंबर, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १ मधील प्रश्न क्रमांक २८८७९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात ७२००० नोंदणीकृत सुशिक्षित बेरोजगार अभियंते असून १०,००० सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांना मागील १० वर्षात एकही काम न मिळाल्याने त्यांना ठेकेदारीचे नोंदणीचे नुतनीकरण करण्यास अडचणी येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांना (वर्ग-५) रुपये ५० लक्ष ऐवजी (वर्ग-४) रुपये १ कोटी ५० लक्ष मध्ये नोंदणी देण्याची कार्यवाही करणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, एकापेक्षा जास्त अभियंते एकत्र येवुन संयुक्त भागीदारी करुन त्यांना किमान रुपये ५ कोटी किंमतीच्या स्पर्धात्मक निविदेसाठी मान्यता देणार आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सुशिक्षित बेरोजगारांना न्याय देण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-०५-२०१८) :** (१) शासन निर्णय, सा.बां.विभाग क्र.सीएटी १०९७/प्र.क्र.४२/इमारत-२, दिनांक ११ फेब्रुवारी २००४ अन्वये बेरोजगार अभियंत्यांना त्यांच्यासाठी विहित केलेल्या रक्कम रुपये ७५ लक्ष किंमतीची कामे मिळाली नसल्याने पुढील कालावधीत सुध्दा त्यांच्या नोंदणीचे नूतनीकरण त्यांच्यासाठी विहित केलेल्या आर्थिक मर्यादेच्या किंमतीची कामे

मिळेपर्यंत विनाअट करण्यात यावे अशी सदर शासन निर्णयामध्ये तरतुद असल्यामुळे त्यांना ठेकेदारी नोंदणीचे नूतनीकरण करण्यात अडचणी येण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.
(२), (३), (४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शालेय अभ्यासक्रमामध्ये कृषी विषय समाविष्ट करणेबाबत**

**(२७) ३८७३४ (०५-०४-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित : तारांकित प्रश्न क्रमांक ३५६२९ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात शालेय अभ्यास क्रमात “कृषी शिक्षण” हा विषय घेतल्यास कृषी क्षेत्राच्या विकासाबाबत माहितीचे ज्ञान प्राप्त होऊन शेती उत्पादन व उत्पादनाचे संशोधन करण्यास विद्यार्थांना लाभ होणार असल्यामुळे शालेय अभ्यास क्रमात “कृषी शिक्षण” हा विषय घेण्याबाबत मागणी होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शालेय अभ्यासक्रमात कृषी विषय समाविष्ट करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-०४-२०१८) :** (१) होय.
(२) प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-२०१२ मध्ये इ. ८ वी सामान्य विज्ञान विषयात आहार आणि पोषण या केंद्र विषयात कृषी व कृषी तंत्रे या घटकाचा समावेश करण्यात आलेला आहे. सदर घटकाअंतर्गत १) पारंपारिक शेती २) आधुनिक शेती तंत्रे या उपघटकांचा समावेश करण्यात आला आहे.

इ.९ वी व १० वी च्या पाठ्यपुस्तकामध्ये कृषी विकासाचे महत्वाचे टप्पे, जैवतंत्रज्ञांनामुळे शेती व्यवस्थापनात झालेले बदल, जैवतंत्रज्ञांनाचे व्यावहारिक उपयोग, सेंद्रिय शेती, कृषी पर्यटन, शेतीपूरक व्यवसाय याबाबतच्या माहितीचा समावेश केलेला आहे.

शिक्षण व्यवसायाभिमुख व्हावे या दृष्टीने इ.९ वी व १० वी साठी समग्र शिक्षा अभियानांतर्गत माध्यमिक स्तरावरील व्यवसाय शिक्षण अंतर्गत National Skill Qualification Framework (NSQF) चे एकूण १० विषय सुरू करण्यात आलेले आहेत. १० विषयांपैकी कोणताही एक विषय शाळांना निवडता येतो. त्यामध्ये शेती या विषयाचा समावेश आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील वरीष्ठ महाविद्यालयात रजा न घेता पी.एच.डी.पदवीसाठी लागलेला कालावधी पदोन्नती व भरतीसाठी ग्राहय धरण्याबाबत

**(२८) ३८७३७ (०५-०४-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वरीष्ठ महाविद्यालयात सेवा अंतर्गत रजा न घेता पी.एच.डी. पदवीसाठी लागलेला कालावधी पदोन्नती व भरतीसाठी शिक्षक अनुभव ग्राहय धरण्याचा विद्यापीठ अनुदान आयोगाने दिनांक ४ फेब्रुवारी, २०१६ रोजी निर्णय घेतला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विद्यापीठ अनुदान आयोगाने सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी सर्व विद्यापीठांना दिनांक १ मार्च, २०१६ रोजी कळविले परंतु कोणतेही विद्यापीठ याची अंमलबजावणी करत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१८-०६-२०१८) :** (१) होय, खरे आहे.
(२) व (३) प्रश्नात नमूद केल्याप्रमाणे विद्यापीठ अनुदान आयोगाने सदरचा निर्णय सर्व संबंधितांना दिनांक ०१ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये कळविला आहे. तथापि, याबाबत शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य यांनी दिनांक ६ मे, २०१७ रोजीच्या पत्रान्वये विद्यापीठ अनुदान आयोगाकडून स्पष्टीकरण मागविण्यात आले व नंतर दिनांक १६ एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये दिनांक १ मार्च, २०१६ चे पत्र रद्द करण्याची विद्यापीठ अनुदान आयोगाकडे विनंती केली आहे. सबब विद्यापीठ अनुदान आयोगाच्या सदरहू निर्णयातील तरतुद राज्य शासनाने स्वीकारलेली नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील आयएएस सेंटरमध्ये मुलींच्या सुरक्षितेसाठी महिला वार्डनची नेमणूक करण्याबाबत

**(२९) ३९१७९ (०५-०४-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विदर्भातील विद्यार्थ्यांना आयएएस, आयपीएस परीक्षेच्या तयारीसाठी नागपूरात भारतीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र उभारण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या आयएएस सेंटरमध्ये किती विद्यार्थी प्रवेश घेऊ शकतात,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर सेंटरमध्ये मुलींच्या सुरक्षिततेसाठी महिला वार्डनची नेमणूक करण्याबाबत व इतर सोयी सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदर प्रशिक्षण केंद्राची प्रवेश क्षमता १२० एवढी आहे.

(३) सदर प्रशिक्षण केंद्रासाठी महिला वार्डनचे पद मंजूर नाही. मुलींच्या सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून सदर प्रशिक्षण केंद्राच्या वसतिगृहामध्ये मुलींसाठी स्वतंत्र विंग राखीव ठेवण्यात आली असून, आवश्यक त्या सुविधा उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**डॉ बाबासाहेब आंबेडकर यांनी जनता साप्ताहिकातून केलेले लिखाण प्रकाशित करण्याबाबत**

**(३०) ३९२४४ (०५-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३१८६३ ला दिनांक ८ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सन १९३० ते १९५५ या काळात प्रकाशित झालेल्या जनता साप्ताहिकामधील लेखनाचे मूळ दस्तऐवज नागपूर विद्यापीठाकडून डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीस माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये प्राप्त होवूनही सदर दुर्मिळ साहित्याच्या प्रकाशनाबाबतची प्रक्रिया सुरु करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन जनता साप्ताहिकातील उक्त लिखाण प्रकाशित करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) नागपूर विद्यापाठाकडून समितीला मूळ (झेरॉक्स) दस्ताऐवज प्राप्त झाले असून त्यावर डीटीपी प्रक्रिया सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात सुक्ष्म व ठिबक सिंचन योजनेचे अनुदान**
**शेतकऱ्यांना वाटप करण्याबाबत**

**(३१) ३९४२८ (०५-०४-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, अॅड.जयदेव गायकवाड, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, अॅड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, अॅड.राहुल नार्वेकर, श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३४९१४ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सुक्ष्म सिंचन योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून राज्याकरीता मंजूर झालेल्या रुपये ३८० कोटी अनुदानापैकी पहिल्या टप्प्यात रुपये १९० कोटी अनुदान राज्य शासनास प्राप्त झाले असून राज्याच्या हिश्श्याचा रुपये १२६ कोटी असे एकूण रुपये ३१६ कोटी अनुदान शासनाला उपलब्ध झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपलब्ध निधीपैकी ६० टक्के निधी शेतकऱ्यांना वितरीत करण्याबाबतचे आदेश कृषी आयुक्तांनी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये दिले असून कृषी विभागाच्या ऑनलाईन संगणकीय गोंधळामुळे सहा महिन्यांपासून सुक्ष्म सिंचन अनुदानाचे वितरण प्रलंबित राहिले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यात शेतकऱ्यांना ठिबक सिंचनासाठी मिळणारे अनुदान ठिबक बसविल्यानंतर दोन वर्षानंतर दिले जात असल्यामुळे शेतकऱ्यांना दोन वर्षाचे १३ टक्के दराने व्याज भरावे लागत असल्याने शेतकऱ्यांना या अनुदानाचा कोणत्याही प्रकारे फायदा नसून तो केवळ बँकानाच होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यातील शेतकऱ्यांना ठिबक सिंचन अनुदानासाठी केंद्र व राज्य शासनाने सन २०१७-१८ या कालावधीत किती निधी मंजूर केला आहे, त्यापैकी किती शेतकऱ्यांना निधीचे वाटप करण्यात आले आहे,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सुक्ष्म व ठिबक सिंचन अनुदान योजनेंतर्गत सुक्ष्मसिंचन संच बसवून अनुदानासाठी प्रस्ताव सादर केलेल्या शेतकऱ्यांची मोका तपासणी करून अनुदान रक्कम वेळेत अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२३-०५-२०१८) :** (१) केंद्र शासनाने, केंद्र हिश्श्याचा मंजूर नियतव्यय रुपये ३८० कोटी पैकी रुपये ३१५ कोटी एवढा निधी उपलब्ध करुन दिला आहे. राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी जिल्हा विकास निधी मधून उपलब्ध करुन घेण्यात येतो.
(२) नाही.
(३) पुर्व संमती प्राप्त शेतकऱ्यांनी सुक्ष्म सिंचन संचाची उभारणी करुन अनुदानासाठी प्रस्ताव सादर केल्यानंतर मोका तपासणी करुन शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर अनुदानाची रक्कम जमा करण्यात येते.
(४) व (५) केंद्र शासनाकडून रुपये ३१५ कोटी एवढा निधी प्राप्त झाला आहे. त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा जिल्हा विकास निधीमधून उपलब्ध करुन घेणार आहे. मराठवाडा विभागासाठी राज्य शासनाने रुपये ११४ कोटी एवढा निधी उपलब्ध करुन दिला आहे.

सदर निधीमधून १६९११३ शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर अनुदानाची रक्कम रुपये ४२५.३० कोटी जमा करण्यात आली आहे. उर्वरित १९४०६५ शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर अनुदानाची रक्कम जमा करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## श्रीकृष्णा नगर, चित्रनगरी (गोरेगाव, मुंबई) येथील शौचालयाचे बांधकाम निष्कासित केल्याबाबत

**(३२) ३९६६२ (०५-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) श्रीकृष्णा नगर, चित्रनगरी (गोरेगाव, मुंबई) येथे भारत सरकारच्या स्वच्छ भारत अभियानांतर्गत बांधण्यात आलेल्या १२ शौचालयाच्या बांधकामासाठी एकूण किती खर्च आला, तसेच सदर शौचालयाचे बांधकाम गोरेगाव येथील स्थानिक लोकप्रतिनिधीच्या तक्रारीवरुन फिल्मसिटीच्या अधिकाऱ्यांनी पोलिसांच्या संरक्षणात बुलडोझर व कामगार आणुन पूर्णपणे तोडुन टाकले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लोकप्रतिनिधीच्या शासकीय निधीचा वापर करुन स्थानिक नागरिकांच्या व रहिवाश्यांच्या सोयीसाठी बांधलेले स्वच्छता गृह तोडण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, स्थानिक लोकप्रतिनिधीने चित्रनगरीत फुटपाथवर शौचालय बांधले असून तेथे राहत असलेल्या शिवसैनिकांनी स्थानिक लोकप्रतिनिधींच्या आश्रयाने अनधिकृत ३० x ३० चे तीन गाळे बांधले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार नवीन स्वच्छता गृह पाडल्यामुळे स्थानिक नागरिकांची/रहिवांश्याची झालेली गैरसोय दुर करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२८-०५-२०१८) :** (१) अंशत: हे खरे आहे.

श्रीकृष्णा नगर, चित्रनगरी येथे अनधिकृतरित्या बांधण्यात आलेल्या शौचालयांच्या बांधकामाविरुध्द महामंडळामार्फत दिंडोशी पोलीस ठाणे येथे तक्रार दाखल करण्यात आली होती. सदर अनधिकृत बांधकाम महामंडळाने तोडण्याची कार्यवाही केली असून तोडण्यात आलेली शौचालये ही स्वच्छ भारत अभियानांतर्गत बांधण्यात आली नव्हती.

(२) तोडण्यात आलेले शौचालये ही अनधिकृतरित्या बांधण्यात आली होती.

(३) व (४) वरील शौचालयाव्यतिरिक्त फिल्मसिटी रस्त्याच्या फुटपाथवर महानगरपालिकेने शौचालय बांधले आहे. सदर शौचालयासाठी चित्रनगरी महामंडळाकडून NOC घेतलेली नाही. सदर रस्ता चित्रनगरीच्या हद्दीमध्ये असून त्याची देखभाल दुरुस्ती महानगरपालिकेकडून करण्यात येते.

चित्रनगरीच्या हद्दीवर काही ठिकाणी अतिक्रमण झाले आहे. सदर अतिक्रमण निष्कासनाबाबत कार्यवाही करण्याकरीता जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना कळविण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महात्मा फुले आणि भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या वाङ्मय कोषाचे काम सुरु करण्याबाबत

**(३३) ३९६९४ (०६-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्रातील महात्मा फुले आणि भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या परंपरेतील लेखक, साहित्य चळवळी, कार्यकर्ते यांची समग्र माहिती देणारा वाङमय कोष तयार करण्याचे शासनाच्या विचाराधीन असून मागील सुमारे साठ वर्षातील माहितीचा त्यासाठी विचार करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी निर्णय घेण्यात आला आहे काय, निर्णयाचे स्वरुप काय आहे, सदर निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी कोणत्या यंत्रणा निर्माण करण्यात आल्या, तसेच यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व किती निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वाङमय कोषाचे काम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अल्पसंख्यांकांच्या कल्याणासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत

**(३४) ३९६९८ (०५-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अल्पसंख्यांकांच्या कल्याणासाठी राबविण्यात येणाऱ्या राज्यस्तरीय योजनांसाठी सन २०१७-१८ मध्ये रुपये ३३२ कोटी इतका निधी उपलब्ध करण्याचे प्रस्तावित होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निधीपैकी किती निधी अल्पसंख्यांकांच्या कल्याणासाठी राबवावयाच्या योजनांकरीता उपलब्ध करण्यात आला आहे व त्यातुन कोणत्या योजना राबविण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे व त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(३) असल्यास, प्रस्तावित असलेल्या रुपये ३३२ कोटी निधीपैकी उर्वरित निधी वितरीत न करण्याची कारणे काय आहेत व सदर निधी केव्हा उपलब्ध करण्यात येणार आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अल्पसंख्यांकांच्या कल्याणासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) राज्यातील अल्पसंख्यांकांच्या कल्याणासाठी राबविण्यात येणाऱ्या राज्यस्तरीय योजनांसाठी सन २०१७-१८ मध्ये रुपये ३३२ कोटी इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे.

(२) अल्पसंख्यांक विभागासाठी राज्यस्तरीय योजनांसाठी सन २०१७-१८ साठी रुपये २८१.६३ कोटी निधी प्रत्यक्षात वितरित करण्यात आला होता. सदर निधीतून राज्यशासनामार्फ़त अल्पसंख्यांकांच्या विकासासाठी राबविण्यात येणाऱ्या एकूण २६ योजनांसाठी निधीचा विनियोग करण्यात आला. सदरबाबतचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

# सन २०१७-१८ करीता नियतव्यय / अर्थसंकल्पीय तरतूद /वितरण
## विभागाचे नाव : अल्पसंख्याक विकास विभाग

रुपये कोटीत

| अ.क्र. | | सन २०१७-१८ करीता मंजूर मूळ नियतव्यय | दिनांक ६/०२/२०१८ च्या वित्त विभाग शासन निर्णयानुसार उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूद (८०%) | विभागामार्फत वितरीत तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | मोफत शिकवणी व संलग्न योजना याकरीता सहायक अनुदान | ३.०० | २.४० | ०.७९ |
| २ | अल्पसंख्याक सकेंद्रित क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण (ITI) संस्थांना सहायक अनुदान | २.०० | १.६० | १.६० |
| ३ | अल्पसंख्याक संकेंद्रित क्षेत्रातील क्षेत्रविकास योजनेकरीता सहायक अनुदान | २५.०० | २०.०० | २०.०० |
| ४ | शहरांमधील अल्पसंख्यांक समाजातील मुलींकरीता वसतीगृहांकरीता सहायक अनुदान | १४.०० | ११.२० | १८.५५ |
| ५ | अल्प कालावधीत व्यवसायावर आधारित पाठ्यक्रमांकरीता सहायक अनुदान | २.०० | १.६० | १.६० |
| ६ | स्वयंसहाय गटांकरीता सहायक अनुदान | २.०० | १.६० | १.६० |
| ७ | हेल्पलाईन करीता सहायक अनुदान | ०.१० | ०.०८ | ०.०८ |
| ८ | अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देण्याकरीता सहायक अनुदान | १.९० | १.५२ | ०.६३ |
| ९ | अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रिय विकास योजना - राज्याचा हिस्सा (केंद्र पुरस्कृत योजना) | ३५.०० | ३५.०० | ४.८० |
| १० | राज्य अल्पसंख्याक आयोगाला सहायक अनुदान (पोलीस प्रशिक्षण, मराठी फाउंडेशन कोर्स इ.) | ५.०० | ४.०० | ९.०० |
| ११ | हज कमिटीला सहायक अनुदान (औरंगाबाद येथे हज हाऊस बांधणे) | १०.०० | ८.०० | ०.४९ |
| १२ | उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजना | १००.०० | १००.०० | १०७.२९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ | अल्पसंख्यांक शाळांना पायाभूत सुविधा पुरविण्याकरीता सहायक अनुदान | २०.०० | १६.०० | १२.५२ |
| १४ | वक्फ बोर्डाकरीता सहायक अनुदान | ५.०० | ४.०० | ०.४२ |
| १५ | अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी नवीन तंत्रनिकेतन (Polytechnic) संस्था सुरु करण्यासाठी सहाय्यक अनुदान | २.०० | १.६० | ११.६० |
| १६ | अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी / तिसरी पाळी सुरु करण्याकरीता सहायक अनुदान | १५.०० | १२.०० | १४.९४ |
| १७ | अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रिय विकास योजना - केंद्राचा हिस्सा (केंद्र पुरस्कृत योजना) | ७५.०० | ७५.०० | ६.२५ |
| १८ | उर्दु घराकरीता सहायक अनुदान | ८.०० | ६.४० | ४.०७ |
| १९ | उर्दु अकादमीकरीता सहायक अनुदान | १.०० | ०.८० | ०.८० |
| २० | अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान तंत्रनिकेतन (Polytechnic) संस्थांमध्ये दुसरी पाळी सुरु करण्याकरीता सहायक अनुदान | ९.०० | ७.२० | ११.१९ |
| २१ | मदरसा आधुनिकीकरण योजनेकरीता सहायक अनुदान | ८.०० | ६.४० | ५.३६ |
| २२ | अल्पसंख्यांक संकेद्रित ग्रामिण क्षेत्रात क्षेत्र विकास योजनेकरीता सहायक अनुदान | ३५.५० | २८.४० | २८.४० |
| २३ | ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी तरतूद | ०.५० | ०.४० | ०.३९ |
| २४ | मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान | २५.०० | २५.०० | २५.०० |
| २५ | राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळाला भागभांडवली अंशदान | ०.५० | ०.४० | ०.५० |
| २६ | केंद्रपुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) | ०.०० | -- | ०..०० |
| २७ | अल्पसंख्यांक यंत्रमाग धारकांसाठी योजना | ०.०० | -- | ०.०० |
| एकूण (राज्याचा हिस्सा) | | ३२९.५० | २९५.६० | २८१.६३ |
| एकूण (केंद्राचा हिस्सा) | | ७५.०० | ७५.०० | ६.२५ |
| एकूण | | ४०७.०० | ३७०.६० | २८७.८८ |

(३) रुपये ३३२.०० कोटी इतका पूर्णपणे वितरित न करण्याची कारणे खालीलप्रमाणे आहेत,

(i) वित्त विभागाच्या दिनांक ०६/०२/२०१८ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पित निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% इतकी विहित करण्यात आली होती.

(ii) केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना व अल्पसंख्यांक यंत्र भाग धारकांसाठी या दोन योजनांतर्गत रुपये २.५० कोटी उपलब्ध होता तथापि निधीची मागणी प्राप्त न झाल्यामुळे निधी अर्थसंकल्पित करण्यात आला नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील समुद्र किनाऱ्यांवर एलईडी दिव्याद्‌वारे मासेमारी करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३५) ३९७७८ (०५-०४-२०१८). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.प्रविण दरेकर, श्री.प्रसाद लाड, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) समुद्रातील मासळीच्या प्रजननावर आणि तिच्या नैसर्गिक अधिवासावर एलईडी दिव्यांच्या परिणाम होत असल्याने राज्यात एलईडीद्‌वारे मासेमारीवर बंदी घालण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अपुरे मनुष्यबळ व साधनसामुग्रीमुळे उक्त प्रकरणी मत्स्यव्यवसाय विभागामार्फत सक्षमपणे कारवाई होत नसल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील समुद्र किनाऱ्यांवर एलईडी दिव्याद्‌वारे मासेमारी करणाऱ्यांवर धडकपणे कारवाई करण्यासाठी मत्स्यव्यवसाय विभागाला आवश्यकती साधनसामुग्री व मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१५-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) एलईडी द्वारे मासेमारी करणाऱ्यांना प्रतिबंध करण्यासाठी ठाणे-पालघर साठी १ गस्ती नौका, मुंबई शहर-उपनगर साठी १ गस्ती नौका, तर रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यासाठी प्रत्येकी १ गस्ती नौका कार्यरत असून एलईडी द्वारे मासेमारी करणाऱ्या २५ नौकांवर महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम अंतर्गत कारवाई करण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

### म्हाडाचे अध्यक्ष व सदस्यांची नेमणूक करण्याबाबत

**(३६) ३९७८९ (०६-०४-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सर्वसामान्य मुंबईकरांना परवडणाऱ्या दरात घरे देण्याचा लौकिक असलेल्या म्हाडाचे अध्यक्ष व सदस्य ही पदे रिक्त असल्याने दाद कोणाकडे मागायची असा सर्वसामान्यांना प्रश्न पडला असल्याचे दिनांक २१ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात शासनाने निर्णय घेऊन सदर महामंडळावर अध्यक्ष व सदस्यांच्या नेमणूका करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१२-०६-२०१८) :** (१), (२) व (३) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाचे अध्यक्ष व सदस्य तसेच सदरहू प्राधिकरणांतर्गत विभागीय मंडळांचे सभापती व सदस्य अशा अशासकीय पदांपैकी पुणे गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळाच्या सभापतीपदी श्री.समरजितसिंह घाटगे यांची दिनांक १०/०४/२०१७ रोजीच्या अधिसुचनेद्वारे नियुक्ती करण्यात आली आहे. उर्वरित सर्व अशासकीय पदे रिक्त आहेत.

सदरहू अशासकीय पदे भरण्याच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## रायगड जिल्हयातील मच्छी मरतूकीचा सर्वेक्षण प्रत्येक वर्षी करण्याबाबत

**(३७) ३९८९३ (०५-०४-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्हयातील मत्स्यव्यवसाय विभागाकडून दर ३ वर्षांनी मच्छी सर्वेक्षण केले जाते, त्याप्रमाणे अलिबाग तालुक्यातील सर्व मच्छिमार संस्थांचा मच्छी मरतूकीचा सर्वेक्षण करून ते एकत्रित करून त्यावरून मच्छी मरतूकीची सरासरी काढून निकष काढण्यात येतो हीच परिस्थिती रायगड जिल्हयातील विविध मच्छिमार संस्थांची आहे, हे ही खरे आहे काय,

(२) असल्यास, विविध मच्छिमार संस्थांना कमी अधिक प्रमाणात मच्छी मरतूक होत असल्याने काही संस्थांना जास्त प्रमाणात नफा मिळतो तर काही संस्था तोट्यात असतात त्यामुळे मत्स्य विभागाकडून काढण्यात येत असलेल्या मच्छी मरतूकीच्या सरासरीमुळे तोट्यात असणाऱ्या संस्था दुष्काळग्रस्त म्हणून जाहीर होवू शकत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दरवर्षी प्रत्येक संस्थावार मच्छी मरतूकीचा सर्वेक्षण करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०७-०६-२०१८) :** (१) नाही, हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण पूर्व (जि.ठाणे) भागात तहसिल कार्यालयाचे विभागीय कार्यालय सुरु करण्याबाबत

**(३८) ४००४४ (०५-०४-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण पूर्व (जि.ठाणे) भागातील नागरिकांना महसूली कामे व विद्यार्थ्यांचे दाखले इ. कामांसाठी कल्याण पश्चिमेतील तहसिल कार्यालयात

जावे लागत असल्याने नागरिकांचा वेळ व पैशाचा अपव्यय होत असल्याने, कल्याण पूर्व परिसरात तहसिल कार्यालय सुरु करण्याबाबतची मागणी कल्याण (पूर्व) भागातील ज्येष्ठ नागरिक सेवा संघाने मा.मुख्यमंत्री यांच्याकडे दिनांक १५ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कल्याण (पूर्व) भागात तहसिल कार्यालयाचे विभागीय कार्यालय सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०६-२०१८) :** (१) होय.

(२) तालुका विभाजनाचे निकष निश्चित करण्याबाबत विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. सदर अहवालाची तपासणी करुन तालुका विभाजनाचे निकष निश्चित करण्याकामी धोरणात्मक निर्णय घेण्याच्यादृष्टीने प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येणार आहे. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निश्चित होणाऱ्या निकषांप्रमाणे प्रकरणपरत्वे नवीन तालुका निर्मिती संदर्भात निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.

ठाणे जिल्हयातील कल्याण तालुक्यातील कल्याण (पूर्व) भागात अपर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याची बाब सद्या शासनाच्या विचाराधीन नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील कौशल्य विकास कार्यक्रमाबाबत**

**(३९) ४००९३ (०६-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील तरुणांमध्ये रोजगार क्षमता वाढावी व त्यांना कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देण्याच्या उद्देशाने पंडित दिनदयाळ उपाध्याय या केंद्र शासनाच्या कौशल्य विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यात सन २०१४ पासून करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गेल्या तीन वर्षात या योजनेंतर्गत किती तरुणांना कौशल्य विकासाच्यादृष्टीने कोणकोणत्या उद्योगाचे प्रशिक्षण देण्यात आले आहे,
(३) असल्यास, कौशल्य विकास प्रशिक्षण देण्यासाठी कोणकोणत्या संस्थांची निवड करण्यात आली होती व त्यासाठी कोणते निकष निश्चित करण्यात आले होते,
(४) असल्यास, कौशल्य विकास योजनेंतर्गत घेतलेल्या प्रशिक्षणाच्या आधारे किती तरुणांनी आपला स्वयंरोजगार सुरु केला आहे,
(५) असल्यास, कौशल्य विकास कार्यक्रम राबविण्यासाठी गेल्या तीन वर्षात वर्षनिहाय किती रक्कम खर्च करण्यात आली आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे, दीनदयाल उपाध्य अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियानांतर्गत कौशल्य प्रशिक्षणाद्वारे रोजगाराची उपलब्धता या उपांगाची अंमलबजावणी सन २०१४ पासून करण्यात येत आहे.
(२) सन २०१५-१६ ते सन २०१७-१८ या ३ वर्षाच्या कालावधीत १,००,७३९ उमेदवारांना कौशल्य प्रशिक्षण देण्यात आलेले असून त्यांना केंद्र शासनाच्या NCVT मार्फत मान्यताप्राप्त ७० सेक्टरमधील ६२९ तसेच SSC मार्फत मान्यताप्राप्त ३८ प्रकारच्या क्षेत्रातील व्यावसायिक अभ्यासक्रमांचे कौशल्य प्रशिक्षण देण्यात येते.
(३) कौशल्य प्रशिक्षण देण्यासाठी केंद्र शासनाच्या NCVT/ SSC मार्फत अभ्यासक्रमावर आधारित निकष जसे उपलब्ध जागा, आवश्यक वीजभार, साधन- सामुग्री, प्रशिक्षकांची पात्रता या निकषांवर व्यावसायिक प्रशिक्षण संस्थेची निवड करण्यात येते. माहे मार्च २०१८ अखेर राज्यात एकुण ३२४६ प्रशिक्षण संस्थांना सूचिबध्दता प्रदान करण्यात आली आहे.

(४) सदर कौशल्य विकास योजनेतंर्गत एकुण ९३७ उमेदवारांनी स्वंयरोजगार सुरू केलेला आहे.

(५) दीनदयाल उपाध्य अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियानांतर्गत कौशल्य प्रशिक्षणाद्वारे रोजगाराची उपलब्धता या उपांगाची अंमलबजावणी करताना गेल्या तीन वर्षात खालीलप्रमाणे निधी खर्च करण्यात आलेला आहे.

| | |
|---|---|
| सन २०१५-१६ :- | रुपये ९७.७७ लाख |
| सन २०१६-१७ :- | रुपये ८२३.२६ लाख |
| सन २०१७-१८ :- | रुपये ६३४१.०० लाख |

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात दुध योजना व शितकरण केंद्र सुरु करण्याबाबत

**(४०) ४०२०१ (०५-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ : तारांकित प्रश्न क्रमांक ३५९१५ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **दुग्धविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात बंद पडलेल्या आणि बंद पडण्याची शक्यता असलेल्या शासकीय दुध योजना व शीतकरण केंद्राचे खाजगी सार्वजनिक सहभागाच्या तत्वावर पुनर्जीवन करण्यासाठी तांत्रिक सल्लागाराची नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला असून शासनाच्या मालकीच्या पूर्णपणे बंद असलेल्या १२ दूध योजना व ४५ दुध शीतकरण केंद्रे पुन्हा सुरू करण्यात येणार आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आरे उत्पादने अन्य दुकाने व मॉल्समध्ये विकण्याची मुभा दिली जाणार असताना नुतनीकरासाठी रुपये २५० ते ३०० कोटी खर्च अपेक्षित असतांना मुंबई, पुणे,नांदेड, अहमदनगर येथील उर्वरित सर्व डबघाईस आलेल्या दुध योजना व शितकरण केंद्रास अर्थसहाय्य देण्यास येणार आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१४-०५-२०१८) :** (१), (२) व (३) शासकीय दूध योजना व शीतकरण केंद्रांचे खाजगी सार्वजनिक सहभागाच्या तत्वावर पुनर्जीवित करण्यासाठी तांत्रीक सल्लागाराची नेमणूक करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तांत्रिक सल्लागाराच्या अहवालानुसार अंतिम निर्णय घेऊन योजना राबविण्यात येणार आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मंत्रालय, मुंबई येथे रंगीत पेव्हर ब्लॉक बसविण्याच्या कामात गैरव्यवहार झाल्याबाबत**

**(४१) ४०३११ (०५-०४-२०१८). प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक ३५५०२ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील मंत्रालयाच्या आवारात रंगीत पेव्हर ब्लॉक बसविण्याचे कामात गैरव्यवहार झाल्याप्रकरणी प्राप्त झालेल्या तक्रारीच्या अनुषंगाने अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम, दक्षता पथक मंडळ, मुंबई यांना सखोल चौकशी करून सविस्तर अहवाल सादर करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यानुषंगाने सविस्तर चौकशीची कार्यवाही पूर्ण झाली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार संबंधित दोषीविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०५-२०१८) :** (१) होय.
(२) नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शारिरीक शिक्षण विषयाचा तासिक बदल करुन ग्रेडपध्दती ऐवजी गुणप्रक्रिया राबविण्याबाबत

**(४२) ४०३६६ (०५-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५२४३ ला दिनांक २१ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शारिरीक शिक्षण विषयाकडे टाईमपास म्हणून बघण्याच्या वृत्तीमुळे हा विषय शालेय वेळापत्रकातून हद्दपार होईल की काय अशी परिस्थिती निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षणासह विद्यार्थ्यांचा शारिरीक विकास व्हावा, विद्यार्थी तंदुरुस्त व्हावा, क्रीडा स्पर्धेचे व्यासपीठ त्याला खुले व्हावे या उदात्त हेतूने शारिरीक शिक्षण या विषयाचा समावेश शालेय वेळापत्रकात करण्यात आला असून पस्तीस मिनिटांच्या दोन तासिका करुन हा विषय हद्दपार करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शारिरीक शिक्षण विषयाकरीता ग्रेडपध्दती ऐवजी गुणप्रक्रिया राबविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मुलांना देण्यात येणारे प्रोजेक्ट हे लहान मुलांच्या बुध्दीमत्तेपेक्षा मोठ्या स्वरुपाचे असल्याबाबत

**(४३) ४०४०० (०५-०४-२०१८). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये प्रोजेक्टच्या नावाखाली शाळकरी मुलांना घरी तयार करण्याकरीता देण्यात येणाऱ्या अनेक विविध बाबींमुळे पालक वर्गात संभ्रमाचे वातावरण निर्माण झाल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, घरी तयार करण्याकरीता देण्यात येणारे प्रोजेक्ट हे लहान मुलांच्या बुध्दीमत्तेपेक्षा खुप मोठ्या स्वरुपाचे असल्याने सदरहू प्रोजेक्ट हे पालकांनाच तयार करुन द्यावे लागतात त्यामुळे लहान मुलांना याचा किती फायदा होत आहे याबाबत शासनाने काही तज्ञ लोकांची नियुक्ती केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन लहान मुलांना याचा कोणताच फायदा न होता उलट पालकांना त्रास सहन करावा लागत असल्याने याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) नाही.
(२) नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रत्नागिरी-कोल्हापूर-नागपूर या राष्ट्रीय महामार्ग प्रस्तावाबाबत

**(४४) ४०५११ (०५-०४-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.सुनिल तटकरे, ॲड.जयदेव गायकवाड, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, ॲड.निरंजन डावखरे, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २७१९२ ला दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर-मुंबई समृध्दी महामार्गाच्या धर्तीवर रत्नागिरी-कोल्हापूर-नागपूर असा राष्ट्रीय महामार्ग तयार करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, भूसंपादनाच्या संदर्भात शेतकऱ्यांनी घेतलेल्या हरकती विचारात न घेता भूसंपादन प्रक्रियेत शेतकऱ्यांना विश्वासात न घेता तसेच त्यांच्याशी कोणत्याही प्रकारचा संवाद न साधता रेडीरेकनरप्रमाणे दराची चर्चा केली नसताना तसेच आपल्या जमिनी शेतकऱ्यांनी दिल्या नसताना दिनांक ५ फेब्रुवारी, २०१८ रोजी निविदा उघडण्यात येणार आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, प्रस्तावित राष्ट्रीय महामार्गाला आपल्या जमिनी न देण्याबाबत ७०० शेतकऱ्यांनी हरकती दर्शविल्या आहेत, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, या मार्गावरील पडवळवाडी, केर्ले, केर्ली, कुशिरे, निगवे दुभाला, भुये, भुयेवाडी जठारवाडी व शिये या गावांतून प्रादेशिक योजनेनुसार राज्यमार्ग १९४ चे आरक्षण पडले असताना त्याच्या शेजारी उक्त गावातूनच नवीन राष्ट्रीय मार्ग १६६ चे आरक्षण टाकण्यात आले असल्याने शेतकऱ्यांना पुन्हा जमिनी द्याव्या लागणार आहेत, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०५-२०१८)** : (१) हे खरे नाही. रत्नागिरी-कोल्हापूर-सोलापूर (रा.म.क्र.१६६),सोलापूर-तुळजापूर(रा.म.मा.५२) व तुळजापूर-बुटीबोरी (नागपूर) (रा.म.क्र.३६१) ह्या राष्ट्रीय महामार्गाच्या चौपदरीकरणाचा प्रकल्प भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहे.
(२) भूसंपादनाची प्रक्रिया NH Act १९५६ च्या तरतूदीनुसार प्रगतीत असून काही गावांची ३ (D) अधिसूचना प्रसिध्द करण्यात आलेली असून निविदा मागविण्यात आल्या असून २७/०४/२०१८ पर्यंत निविदा सादर करण्याचा कालावधी असल्याचे प्रकल्प संचालक,भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण,कोल्हापूर यांनी कळविले आहे.
(३) प्रस्तावित राष्ट्रीय महामार्गाला कोल्हापूर जिल्हयामध्ये एकूण ४६५ व रत्नागिरी जिल्हयामध्ये एकूण ७४ अश्या एकूण ५३९ हरकती संबंधित भूसंपादन अधिकाऱ्यांकडे प्राप्त झाल्याचे / नोंदवल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, कोल्हापूर यांनी कळविले आहे.

(४) व (५) चौपदरी रस्त्यांसाठी मानकाप्रमाणे आखणी करण्यासाठी भौमितिक सुधारणा आवश्यक असून स्थानिक शेतकरी व लोकप्रतिनिधी यांचेसमवेत चर्चा करुन तांत्रिक व व्यावहारीकदृष्टया आखणी अंतिम करण्याची कार्यवाही प्रगतीत असल्याचे प्रकल्प संचालक,भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण,कोल्हापूर यांनी कळविले आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कृषी विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४५) ४०६८८ (०५-०४-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५१५२ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्याच्या कृषी विभागात ८३६७ पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरची पदे रिक्त असण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदरील रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२३-०५-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

माहे डिसेंबर, २०१७ अखेर कृषी विभागात गट-अ ते गट-ड मधील एकूण ८६२३ पदे रिक्त आहेत.
(२) वित्त विभाग शासन निर्णय दिनांक २ जून, २०१५ व दिनांक २५ मे, २०१७ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार पदभरतीवर असलेल्या निर्बंधांमुळे सदर पदे रिक्त आहेत.
(३) महाराष्ट्र कृषी सेवा गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील ७९ पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास सन २०१७ मध्ये मागणीपत्र सादर केलेले आहे, सदर पदांसाठी लोकसेवा आयोगाकडून शिफारसपत्र प्राप्त झाल्यानंतर नियुक्तीची कार्यवाही करण्यात येईल. तसेच सन २०१८ मध्ये ७१

पदांचे मागणीपत्र आयोगास सादर केलेले आहे. कृषी पर्यवेक्षक संवर्गातील ६० कर्मचाऱ्यांच्या कृषी अधिकारी पदावरील पदोन्नतीचे आदेश दिनांक ३० जानेवारी, २०१८ रोजी निर्गमित झाले आहेत.

सन २०१५ च्या निवड यादीतील कृषी सहाय्यक संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील ७३० रिक्त पदी निवड झालेल्या उमेदवारांना नियुक्तीपत्र देण्याची कार्यवाही विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर सुरु आहे त्याचप्रमाणे कृषी सहाय्यक संवर्गातील दिनांक ३१/१२/२०१८ अखेरची संभाव्य रिक्त पदे विचारात घेता सरळसेवेची एकूण ९०८ पदे भरण्यासाठी जाहिरात विज्ञापीत करण्यात आलेली आहे.

कृषी आयुक्तालयाच्या अधिनस्त महाराष्ट्र कृषी सेवेतील १०० टक्के रिक्त पदे भरण्यासाठी मा.मुख्यमंत्री महोदयांनी मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वित्त विभागाने रितसर शासन निर्णय निर्गमित केल्यानंतर रिक्त पदे भरण्याबाबत पुढील कार्यवाही करण्यात येणार आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आंबोली (ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग) घाट मार्गाच्या पर्यायी मार्गास मंजूरी देण्याबाबत

**(४६) ४०८५६ (०५-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.जयंत पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २९१५६ ला दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आंबोली (ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग) घाट मार्गात वारंवार दरड कोसळत असल्याने सदर घाट मार्ग वाहतूकीसाठी अनेक दिवस बंद ठेवण्यात येत असल्याने या आंबोली घाट मार्गाला पर्यायी म्हणून केसरी-दाणोली-फणसवडे, चौकुळ-नेनेवाडी असा सुमारे १० कि.मी. अंतराचा नवीन रस्ता तयार करण्यात यावा म्हणून त्या परिसरातील ग्रामस्थांनी सुमारे २० वर्षांपासून सातत्याने मा.मुख्यमंत्री, मा.सार्वजनिक बांधकाम मंत्री, जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सावंतवाडी आदींकडे लेखी निवेदनाद्वारे, आंदोलने करून मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दरवर्षीच्या रस्ते आराखड्यात या पर्यायी मार्गाचा समावेश करण्यात येत असतानाही आजमितीस सदरहू पर्यायी मार्गास मंजूरी देण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदरहू आंबोली घाट मार्गाला पर्यायी मार्गाच्या रस्त्याच्या कामास मंजूरी व आवश्यकती आर्थिक तरतूद उपलब्ध करुन रस्त्यांचे काम पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३०-०५-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
पर्यायी रस्त्याच्या काही लांबीत काम करण्यासाठी आवश्यक भूमीचे संपादन करणेसाठीचे काम अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आले आहे. भूसंपादनाची कार्यवाही प्रगतीत आहे.
(३) व (४) आंबोली घाटातील रस्त्यासाठी पर्यायी रस्ता म्हणून दाणोली-केसरी-फणसवडे-नेनेवाडी चौकुळ रस्ता प्रजिमा ६० चा वापर करण्याचे नियोजन आहे. या रस्त्याच्या कि.मी. ९/४०० ते कि.मी. १९/४०० या १० कि.मी. लांबीत रस्ता अस्तित्वात नाही. या लांबीतील रस्त्याच्या बांधकामासाठी आवश्यक जमिनीचे संपादन करण्याचे काम प्रगतीत आहे.
भूसंपादन झाल्यावर या लांबीत रस्त्याचे बांधकाम व इतर लांबीतील रस्त्याची सुधारणा करण्याची कामे मंजूरी, निधी, निकष व प्राधान्यक्रमानुसार हाती घेण्याचे नियोजन आहे.

---

## पुणे महानगरपालिका कार्यक्षेत्रात समाविष्ट झालेल्या जिल्हा परिषद शाळेतील शिक्षकांच्या सेवाजेष्ठतेबाबत

**(४७) ४०९७५ (०६-०४-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हा परिषदेच्या कार्यक्षेत्रातील २३ गावे दिनांक १ नोव्हेंबर, १९९९ रोजी वा त्यासुमारास पुणे महानगरपालिकेमध्ये समाविष्ट झालेली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर समाविष्ट केलेल्या जिल्हा परिषद कार्यक्षेत्रातील गावामधील जिल्हा परिषदेच्या शाळा ही समाविष्ट केलेल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त समाविष्ट केलेल्या जिल्हा परिषद शाळेतील शिक्षकांच्या सेवा दिनांक १३ ऑगस्ट, १९९० च्या शासन आदेशाने महानगरपालिका क्षेत्रात पदोन्नतीसाठी मूळ नियुक्ती धरण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सध्या पुणे महानगरपालिकेकडून सेवा जेष्ठता यादी तयार करताना समाविष्ट केलेल्या उक्त शिक्षकांच्या सेवा महानगरपालिकेत समाविष्ट झाल्यापासून धरण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त शिक्षकांनी सेवाजेष्ठता पूर्वीप्रमाणे ग्राह्य धरणेबाबत महानगरपालिकेकडे मागणी केलेली आहे, हे खरे आहे काय,

(६) असल्यास, उक्त शिक्षकांच्या सेवा पदोन्नतीसाठी मूळ नियुक्ती दिनांकापासून ग्राह्य धरणेबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०६-२०१८) :** (१) शासनाच्या राजपत्रान्वये पुणे महानगरपालिकेमध्ये लगतची ३८ गावे वर्ग झाली होती. नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२, दिनांक १७/११/२००१ रोजीच्या राजपत्रान्वये मनपा हद्दीतून १५ गावे वगळण्यात आलेली आहेत.

(२) खरे आहे.

(३) हे खरे आहे.

(४) हे खरे आहे.

(५) हे खरे आहे.

(६) समाविष्ट गावातील शिक्षकांनी विकल्प भरुन दिले असल्याने त्याची मूळ सेवाज्येष्ठता सद्य:स्थितीत धरण्यात आलेली नाही. या बाबत मा.उच्च न्यायालयात रिट याचिका क्र. ६१६१/२०१८ दाखल झालेली आहे.

---

## राज्यातील शिक्षकांची भरती केंद्रीय पध्दतीने करण्याबाबत

**(४८) ४११२१ (०५-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३१४६५ ला दिनांक २५ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासन निर्णय दिनांक २३ जून, २०१७ नुसार २३००० रिक्त शिक्षक भरती केंद्रीय पध्दतीने करावी व खाजगी संस्थेतील शिक्षक भरती अभियोग्यतेच्या गुणानुक्रमे शासनामार्फत करावी इत्यादी मागण्या डीटीईड, बी.एड स्टुडंट असोसिएशन, महाराष्ट्र राज्य यांच्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर मागण्यांबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी शैक्षणिक संस्थांच्या अनुदानित, अंशत: अनुदानित व अनुदानास पात्र घोषित केलेल्या सर्व माध्यमाच्या शाळांमधील (अल्पसंख्यांक शाळा वगळता) शिक्षकाची रिक्त पदे अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीतील गुणांच्या आधारे “पवित्र” या संगणकीय प्रणालीमार्फत भरण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २३/६/२०१७ रोजी पारित केलेला आहे. त्यानुसार माहे डिसेंबर,२०१७ मध्ये अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षा घेण्यात आलेली आहे. “पवित्र” या संगणकीय प्रणालीच्या माध्यमातून सदर भरती प्रक्रीया रिक्त पदांचा आढावा घेवून सुरु करण्यात येत आहे.

---

## मुंबई पोलिसांकडून हिरे व्यापाऱ्यांची फसवणुक आणि चुकीचा तपास केल्याचे निदर्शनास आल्याबाबत

**(४९) ४६६७६ (१५-०१-२०१४). श्री.अनिल तटकरे, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई पोलीसांकडून हिरे व्यापाऱ्यांची फसवणुक आणि चुकीचा तपास केल्याचे दिनांक ४ सप्टेंबर, २०१३ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, फसवणुक करणाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) अद्याप कोणतीच कारवाई केली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.
बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या कार्यक्षेत्रातील कोणत्याही पोलीस ठाण्यात दिनांक ४ सप्टेंबर, २०१३ रोजी वा त्या सुमारास पोलीसांविरुध्द गुन्हा नोंद नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील मध्यवर्गीय तसेच गरीब लोकांना घरे उपलब्ध होण्यासाठी "जॉईन्ट व्हेंचर" योजना राबविण्याबाबत**

**(५०) ४७६०९ (२०-०१-२०१४). श्री.सतीश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील मध्यमवर्गीय तसेच गरीब लोकांना घरे उपलब्ध व्हावीत यासाठी शासनाने "जॉईन्ट व्हेंचर" ही नवीन योजना राबविण्याचा निर्णय नुकताच घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या योजनेचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, ही योजना प्रत्यक्षात केव्हापासून अंमलात आणण्यात येणार आहे ?

**श्री.प्रकाश महेता (२६-०४-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सदर योजना राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**नागपूर.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर.